विभाग प्रमुख, उपयोजित यंत्रशास्त्र, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : ससेनि-३२२२/प्र.क्र.१५९/२२/तांशि-७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ३१ मार्च, २०२३.

**संदर्भ** : १) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना दि. १४ जुलै, २०२१.
२) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र. एचटीआर-०४२२/प्र.क्र.३७/२०२२/अठ्ठावीस, दि. २२/१२/२०२२.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन क्र.०२ येथील दि. २२/१२/२०२२ च्या पत्रान्वये विभाग प्रमुख, उपयोजित यंत्रशास्त्र, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर नियुक्तीसाठी एकूण ०९ उमेदवारांची शिफारस केली आहे.

सदर शिफारशीच्या अनुषंगाने खालील विवरणपत्रात नमूद उमेदवारांना विभाग प्रमुख, उपयोजित यंत्रशास्त्र, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर त्यांच्या नावांसमोर स्तंभ क्र. ०५ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी, ते ज्या दिनांकास त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकारतील त्या दिनांकापासून दोन वर्षांच्या परिविक्षा कालावधीसाठी तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ. क्र. | आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नाव | मूळ प्रवर्ग | आयोगाने शिफारस केलेली वर्गवारी | नियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री. बाजीराव कुंडलिक काकड | खुला | खुला-१ | शासकीय तंत्रनिकेतन, मुंबई |
| २ | श्री. रुपेश रत्नाकर गावंडे | खुला | खुला-२ | शासकीय तंत्रनिकेतन, गोंदिया |
| ३ | श्री. किशोर भास्कर काळे | खुला | खुला-३ | शासकीय तंत्रनिकेतन, पुणे |
| ४ | श्री. संतोष निवृत्ती शेळके | खुला | खुला (Against Open Female)-१ | शासकीय तंत्रनिकेतन, जळगांव |
| ५ | श्री. सुनिल महादेवराव रंगारी | अ.जा. | अ.जा.-१ | शासकीय तंत्रनिकेतन, ठाणे |
| ६ | श्री. राजन लक्ष्मणराव वानखडे | अ.जा. | अ.जा.-२ | शासकीय तंत्रनिकेतन, ब्रम्हपूरी |
| ७ | श्री. शरद दगा कचवे | इ.मा.व. | इ.मा.व.-१ | शासकीय तंत्रनिकेतन, धुळे |
| ८ | श्री. गणेश देवरावजी अवचट | इ.मा.व. | इ.मा.व. (Against OBC Female)-१ | शासकीय तंत्रनिकेतन, नांदेड |
| ९ | श्री. संदीप लक्ष्मण हाके | भ.ज. (क) | Inter Se DT-A General-१ | शासकीय तंत्रनिकेतन, जालना |

**०२.** वरील सर्व उमेदवारांचे चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल तसेच वैद्यकीय तपासणी अहवाल शासनास प्राप्त झाले आहेत. त्याबाबतची नोंद त्यांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी.

**०३.** उपरोक्त उमेदवारांची विभाग प्रमुख, उपयोजित यंत्रशास्त्र, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून, नामनिर्देशनाने निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून नियुक्ती करण्यात येत आहे :-

१) सदर उमदेवारांची वेतनश्रेणी उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.सावेआ-११११/प्र.क्र.४४/१९/तांशि-२, दि.११/०९/२०१९ आणि शासन निर्णय क्र.संकीर्ण-११११/(६४/२०)/तांशि-२, दि.१६/१२/२०२० मध्ये नमूद केल्याप्रमाणे राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व स्थानिक पुरक भत्ता अनुज्ञेय राहील.

३) सदर उमेदवारांना प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारक रित्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.

४) सदर उमेदवारांचे परिविक्षा कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाची नसल्यास अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

५) सदर उमदेवारांची नियुक्ती सरळसेवा प्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमांच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सुट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

६) सदर उमेदवारांचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन), नियम -१९८१ मधील तरतुदींनुसार निश्चित करण्यात यावे.

७) उपरोक्त उमेदवारांनी त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ०५ येथे दर्शविलेल्या ठिकाणी या आदेशाच्या दिनांकापासून ०१ महिन्याच्या आत रुजू व्हावे. सदर विहीत मुदतीत जर त्यांनी नियुक्ती स्विकारली नाही किंवा नियुक्तीच्या संदर्भात त्यांनी वरील मुदतीत शासनास काहीही कळविले नाही, तर कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांच्या नियुक्तीचे सदर आदेश रद्द करण्यात येतील.

८) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.१८/०८/२००९ मधील तरतुदींनुसार दि. ०१ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्ती वेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचाऱ्याने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्ती वेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि.०१ नोव्हेंबर, २००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि. ०१ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि.१२ जानेवारी, २००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधित शासकीय कर्मचाऱ्यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन), नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. दि.१८/०८/२००९ च्या परित्रकात नमूद(i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचाऱ्यास नवीन राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजना लागू ठरतील.

९) सदर उमदेवारांचे सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार राहील.

१०) उमेदवारांना नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

११) सदर उमदेवारांनी नोकरी सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसूचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

**०४.** सदर नियुक्ती उमेदवारांनी सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबून राहील. सदर प्रमाणपत्रे नियुक्तीनंतर खोटे अथवा बनावट आढळल्यास सदर उमेदवारांची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

**०५.** उपरोक्त उमेदवारांपैकी अ.क्र.७ व ८ येथील उमेदवार अनुक्रमे श्री. शरद कचवे व श्री. गणेश अवचट यांची नियुक्ती मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल मूळ अर्ज क्र.११५९/२०२२ मधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

**०६.** हे आदेश प्राप्त होताच संबंधित उमेदवारांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबंधित संस्थाप्रमुखांकडे सादर करावा. संस्था प्रमुखांनी सदर अहवाल संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

**०७.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०३३११२२५४५६९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMEER LAXMAN DHERE

Digitally signed by SAMEER LAXMAN DHERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, pseudonym=B0341853BBBDA46EBB328D4BE0F460D863592476, serialNumber=6EE64CF9B42881125C3715A5DB341B5827C5743C728BC85F04BB71FF8FC154D6, cn=SAMEER LAXMAN DHERE
Date: 2023.03.31 13:30:55 +05'30'

**( समीर ढेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित सर्व उमेदवार (नोंदणीकृत डाकेने)/(ई-मेलव्दारे).

**प्रत :**

१) मा. मंत्री उच्च व तंत्रशिक्षण, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राव्दारे),

३) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई,

४) संबंधित सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालये (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत),

५) संबंधित प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतने (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत),

(वरील उमेदवारांना रुजू करुन घेताना त्यांच्या शैक्षणिक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी करुन संस्था प्रमुखांनी स्वत: खात्री करावी व उमेदवारांना हजर करुन घ्यावे आणि त्याबाबतचा अहवाल संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा. तसेच संबंधित संस्थाप्रमुखांनी उमेदवारांची नियुक्ती या आदेशातील ज्या अटींच्या अधीन राहून केली आहे त्या अटींची उमेदवारांकडून विहीत मुदतीत पूर्तता करुन घेवून त्याबाबतचा कार्यपूर्तता अहवाल संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.)

६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,

७) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,

८) प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,

९) निवडनस्ती (तांशि-७).